महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मध्ये सुधारणा करण्याबाबत

दिनांक १ जानेवारी, २००६ नंतरच्या निवृत्तीवेतनधारकांच्या निवृत्तीवेतनात / कुटुंबनिवृत्तीवेतनात सुधारणा

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शुध्दिपत्रक क्रमांक : सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.दिनांक : १५ डिसेंबर, २००९

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.३३/सेवा ४,दिनांक ३० ऑक्टोबर,२००९

## शुध्दिपत्रक

दिनांक १ जानेवारी,२००६ नंतरच्या निवृत्तिवेतनधारकांच्या निवृत्तिवेतनात / कुटुंबनिवृत्तीवेतनात सुधारणा करण्याबाबतच्या संदर्भाधिन क्रमांक १ मधील दिनांक ३० ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयात खालील बदल करण्यात येत आहेत :

परि.३ नंतर खालीलप्रमाणे परि.३.१चा समावेश करण्यात येत आहे:-

- **३.१ दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक २६ फेब्रुवारी,२००९ पर्यंत सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांची निवृत्तीवेतन प्रकरणे महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात आली नसल्यास ती प्रकरणे प्रथम असुधारित वेतन / असुधारित नियमानुसार तयार करुन महालेखापाल कार्यालयाकडे सादर करावीत. निवृत्तीवेतनाच्या प्राधिकारपत्रानंतर ही प्रकरणे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :सेनिवे १००९/प्र. क्र.३३/सेवा ४,दिनांक ३० ऑक्टोबर,२००९ मधील तसेच या शुध्दिपत्रकातील तरतुदींनुसार सुधारित करण्यात यावीत.**

परि.४ मधील शेवटच्या वाक्यानंतर खालील वाक्याचा समावेश करण्यात येत आहे:-

- **तथापि मूळ वेतनामध्ये व्यवसायरोध भत्त्याचा समावेश होईल.**

परि.५ मधील शेवटच्या वाक्यानंतर खालील वाक्याचा समावेश करण्यात येत आहे:-

- **हे लाभ केवळ स्थायी /स्थायीकरणाचे लाभ दिलेल्या शासकीय कर्मचा-यांना लागू ठरतील.**
- **परि.५, ५.१ व ५.२ मध्ये उल्लेखिलेली अनुक्रमे जोडपत्र १, जोडपत्र २, व जोडपत्र ३ रद्द करण्यात येत असून त्याऐवजी सुधारित जोडपत्र १, जोडपत्र २ व जोडपत्र ३ ही, शुध्दिपत्रकाच्या इंग्रजी प्रतीसोबत जोडल्याप्रमाणे असतील.**
- **इंग्रजी प्रतीच्या परि.५.१ मधील दुस-या ओळीतील retiring शब्दानंतर स्वल्पविराम जोडण्यात येत आहे.**
- **परि.५.५ (ब) (१) मधील महागाई भत्ता या शब्दानंतर '+ अनुज्ञेय असल्यास व्यवसाय रोध भत्ता' या शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.**

परि.५.६ वगळण्यात येत असून त्याऐवजी खालील परि.५.६ चा समावेश करण्यात येत आहे:-

- **५.६ निवृत्तीवेतनाची कमाल मर्यादा राज्य शासनाकडील उच्चतम अनुज्ञेय वेतन + उच्चतम अनुज्ञेय ग्रेड वेतनाच्या ५० टक्के अशी राहील. (उच्चतम वेतन दिनांक १.१.२००६ पासून रुपये ६७,०००/- + रुपये १२,०००/- अनुज्ञेय ग्रेड वेतन असे आहे.)**

निवृत्ती उपदान /मृत्यु उपदान संदर्भातील परि.६ वगळण्यात येत असून त्याऐवजी खालील परि.६ चा समावेश करण्यात येत आहे:-

<u>निवृत्ती उपदान/मृत्यु उपदान -</u>

- **६. संदर्भाधीन दिनांक ३० ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयाच्या परि.४ मध्ये (या शुध्दिपत्रकातील सुधारणेसह) नमूद केलेल्या मूळ वेतनावर निवृत्ती/मृत्यु उपदानाची परिगणना करण्यात येईल. दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक १ सप्टेंबर, २००९ (मध्यान्ह पूर्व) पर्यंत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना त्यांच्या अर्हताकारी सेवेच्या प्रत्येक पूर्ण सहामाही कालावधीकरिता त्याच्या मूळ वेतनाच्या एक चतुर्थांश (कमाल साडेसोळा पट) किंवा रुपये पाच लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके निवृत्ती उपदान अनुज्ञेय राहील. दिनांक १ सप्टेंबर,२००९ रोजी मध्यान्हानंतर किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांकरिता त्यांच्या अर्हताकारी सेवेच्या प्रत्येक पूर्ण सहामाही कालावधीकरिता त्यांच्या मूळ वेतनाच्या एक चतुर्थांश (कमाल साडेसोळा पट) किंवा रुपये सात लाख यापैकी जी रक्कम कमी असेल इतके निवृत्ती उपदान अनुज्ञेय राहील.**

परि.६.१ पूर्वीप्रमाणेच राहील.

परि.७ वगळण्यात येत असून त्याऐवजी खालील परि.७ चा समावेश करण्यात येत आहे:-

- **७. कुटुंब निवृत्तीवेतनाची परिगणना मूळ वेतनाच्या ३० टक्के अशा एकरुप दराने काढण्यात येईल व या कुटुंब निवृत्तीवेतनाची कमाल मर्यादा राज्य शासनाकडील उच्चतम अनुज्ञेय वेतन + उच्चतम अनुज्ञेय ग्रेड वेतनाच्या ३० टक्के अशी राहील. ( उच्चतम वेतन दिनांक १.१.२००६ पासून रुपये ६७,०००/- + रुपये १२,०००/- अनुज्ञेय ग्रेड वेतन असे आहे.)**

परि.७.१ व ७.२ पूर्वीप्रमाणेच राहतील.

- **परि.८ मधील पहिल्या ओळीतील दिनांक '२७ फेब्रुवारी, २००९ पासून' या शब्दाऐवजी '२७ फेब्रुवारी, २००९ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त होणा-या ' या शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.**
- **परि.८.१ मधील तिस-या ओळीतील दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ या शब्दानंतर 'पासून अस्तित्वात येईल व या दिनांकास' हे शब्द वगळण्यात येत असून त्याऐवजी 'रोजी ' या शब्दाचा समावेश करण्यात येत आहे.**
- **इंग्रजी प्रतीतील परि.८.१ मधील तिस-या ओळीतील ' The revised Rule and table will become absolute after' या शब्दांऐवजी ' The existing Rule and table will become obsolete from' या शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.**
- **इंग्रजी प्रतीतील परि.८.१ मधील चौथ्या ओळीतील '/commutation of pension' हे शब्द वगळण्यात येत आहेत.**
- **इंग्रजी प्रतीतील परि.८.२ मधील पहिल्या ओळीतील on or before 27th February,2009 या शब्दाऐवजी 'between 1st January 2006 and 26th February, 2009' या शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.**

परि.८.२ मध्ये शेवटच्या ओळीनंतर पुढील वाक्य जोडण्यात येत आहे :

- **'सदर विकल्प शासकीय कर्मचा-याने तो जेथून सेवानिवृत्त झाला असेल त्या विभाग/कार्यालय प्रमुखाकडे दिनांक ३० मार्च, २०१० पर्यंत सादर करावा. विकल्प विहीत मुदतीत सादर न केल्यास ८.२ (अ) प्रमाणे परिगणना करण्यात येईल.'**

परि.८.२ ब) मधील सूत्र बदलण्यात आले असून सुधारित सूत्र खालीलप्रमाणे राहील:

- **वाढीव निवृत्तीवेतन(सुधारित मूळ निवृत्तीवेतन वजा पूर्वीचे मूळ निवृत्तीवेतन) x १/३ x १२ x अंशराशीकरणाच्या सुधारित तक्त्यानुसार (जोडपत्र-४) कर्मचा-याच्या मूळ अर्जाच्या दिनांकाच्या पुढील जन्मदिनी होणा-या वयाकरिता निश्चीत केलेले अंशराशीकृत मूल्य.**
- **परि.८.४ मधील शेवटचे वाक्य वगळण्यात येत आहे.**
- **परि.१० मधील 'प्रथम हप्त्यात' हे शब्द वगळण्यात येत आहेत. तसेच याच परिच्छेदातील 'डिसेंबर २००९' हे शब्द वगळण्यात येत असून त्याऐवजी 'फेब्रुवारी २०१० ' या शब्दांचा समावेश करण्यात येत आहे.**

परि.१३ मधील शेवटच्या वाक्यानंतर खालील वाक्यांचा समावेश करण्यात येत आहे:-

- **हयातकालीन थकबाकीची रक्कम अनुज्ञेय असल्यास सदर थकबाकीची रक्कम परि.१० मध्ये नमूद केलेल्या रकमा वजा/समायोजित करुन एकाच हप्त्यात त्याच्या कायदेशीर वारसास रोखीने अदा करण्यात यावी. त्याचप्रमाणे थकबाकीचा एक किंवा अधिक हप्ते रोखीने अदा करण्यात आल्यानंतर मृत्यु पावलेल्या निवृत्तीवेतनधारक/कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांच्या बाबतीत अदा करावयाची बाकी असलेल्या हप्त्याची रक्कमही परि.१० मध्ये नमूद केलेल्या रकमा वजा/समायोजित करुन एकाच हप्त्यात त्याच्या कायदेशीर वारसास रोखीने अदा करण्यात यावी.**

**२.** शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील निवृत्तिवेतनधारक यांना वरील शुध्दिपत्रक, योग्य त्या फेरफारासह लागू राहील.

**३.** महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील शुध्दिपत्रक जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहील.

**४.** सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२००९१२१६१२०८५६००१** असा आहे.

**५.** सदर शासन शुध्दिपत्रकाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**निलेश बा. वाडेकर**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१००० प्रती),

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.(१० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
*प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
ग्रं थपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
मंत्रालयातील सर्व विभाग,
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.

Modifications in the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982

Revision of Pension/Family Pension of post 1st January, 2006 Pensioners/Family Pensioners. .

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**FINANCE DEPARTMENT**

Corrigendum No.PEN 1009/C.R.33/SER-4
Mantralaya, Mumbai 400 032 dated 15 December,2009

**Ref :** 1) Government Resolution, Finance Department, No. PEN 1009/CR 33/SER-4, dated 30th October, 2009

## Corrigendum

Following changes are made in the Government Resolution dated 30th October, 2009 referred to above at sr.no.1 regarding revision of pension/family pension of post 1st January, 2006 of pensioners:

The following Para 3.1 is included after Para.3 :

- **3.1 If the proposals of pension of the Government servants who have retired from 1st January, 2006 to 26th February, 2009 are not yet sent to the Accountant General office, such proposals may be prepared initially and sent to Accountant General Office as per pre-revised pay / pre-revised rules. After authorisation of pension such proposals may be revised as per procedure prescribed in the Government Resolution, Finance Department, No. PEN 1009/CR 33/SER-4, dated 30th October, 2009 and in this corrigendum.**

The following sentence is included after the last sentence of Para 4:-

- **But basic Pay includes Non Practicing allowance.**

The following sentence is included after the last sentence of Para 5:-

- **Only permanent employees / permanency benefit holders will be eligible for these benefits.**
- **Annex I, Annex II, and Annex III mentioned in Para 5, 5.1 and 5.2 are cancelled and in lieu thereof revised Annex I, Annex II, and Annex III are enclosed alongwith English version of this corrigendum.**
- **Comma is included after the word retiring in second line of Para 5.1 in English version of the G.R.**
- **The words ' +Non practicing allowance if admissible' are included after the word period in para 5.5 (B) (1).**

Para 5.6 is deleted and the following para 5.6 is included:

- **Pension shall be subject to maximum of upto 50% of highest pay admissible + highest grade pay admissible in the State Government (Since 1st January, 2006, highest pay admissible is Rs.67,000/- + Rs.12,000/-admissible grade pay ).**

Para 6 regarding retirement gratuity/death gratuity is deleted and the following para 6 is included:

**<u>Retirement Gratuity/Death Gratuity :</u>**

- **6. Retirement /Death Gratuity shall be calculated on the basic pay as mentioned in para 4 of the Government Resolution dated 30th October 2009 (read with the changes in this corrigendum). A Government Servant who has retired on or after 1st January, 2006 to 1st September, 2009 (B.N.) will be eligible for retirement gratuity equal to one-fourth of his pay for each completed six monthly period of qualifying service, subject to maximum 16 and1/2 times the pay or Rupees Five lakhs whichever is less. A Government Servant who has retired on or after 1st September, 2009 (A.N) will be eligible for retirement gratuity equal to one-fourth of his pay for each completed six monthly period of qualifying service, subject to maximum 16 and1/2 times the pay or Rupees Seven lakhs whichever is less.**

Para 6.1 remains unchanged.

Para 7 is deleted and the following para 7 is included:

- **Family Pension shall be calculated at a uniform rate of 30% of Basic pay in all cases. Family Pension shall be subject to a maximum of upto 30% of highest pay admissible + highest grade pay admissible in the State Government (Since 1st January, 2006, highest pay admissible is Rs.67,000/- + Rs.12,000/- admissible grade pay ).**

Para 7.1 and 7.2 remain unchanged.

- **The words 'who retired on or after 27th February,2009' are included after the words Government servant in the second line of para 8.**
- **The words 'पासून अस्तित्वात येईल व या दिनांकास' in the third line of para 8.1 in Marathi version of the GR are deleted and are replaced by the word 'रोजी '.**
- **The words ' The revised Rule and table will become absolute after' in line 3 of para 8.1 is substituted as ' The existing Rule and table will become obsolete from'in the English version of the G.R.**
- **The words ' / commutation of pension' are deleted in line 4 of para 8.1 in the English version of the G.R.**
- **The words 'on or before 27th February,2009' are substituted as 'between 1st January 2006 and 26th February, 2009' in first line of para 8.2 in the English version of the G.R.**

The last sentence in para 8.2 is appended with the following sentence :

- **The option should be submitted by the Government servant to the Head of the Deptt/Office from which he has retired before 30th March, 2010. If the option is not submitted within the stipulated time, the calculation would be done according to option 8.2 (a).**

The formula in para 8.2 (b) is changed and the revised formula is as follows:-

- **Enhanced pension (revised basic pension minus unrevised basic pension) x 1/3 x 12 x commuted value for the age next birthday based on the date of original application of Government Servant as per revised (Annex.IV) commutation table.**
- **The last sentence in para 8.4 is deleted.**
- **The word ' in the first installment' in para 10 is deleted. The word December,2009 in para 10 is replaced with the word February,2010..**

The following sentences are included after last sentence in Para 13:-

- **If the amount of arrears is admissible, that should be paid in cash in single installment to the legal heir(s) of pensioner/family pensioner after deducting/adjusting amounts mentioned in para.10. In respect of the pensioners/family pensioners who expired after payment of one or more installment of arrears in cash, that amount along with the balance amount of installment(s), if any remained to be paid in cash should also be paid in cash in one single installment to the legal heir(s) of pensioner/family pensioner after adjusting/ deducting amounts mentioned in para 10.**

**2.** Government is also pleased to direct that the above decision should, mutatis mutandis apply to those Pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities etc., to whom the pension scheme is made applicable.

3. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samiti's Act 1961 (Mah.V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decisions apply to the pensioners of Zilla Parishads.

**4.** This Corrigendum is available on the web site of Government of Maharashtra i.e.-"**www.maharashtra.gov.in**" and its computer code number is **20091216120856001**

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(NBWadekar)

**Nilesh B. Wadekar**
**Deputy Secretary to Government**

(For post-2006 pensioners)

# ANNEXURE -I

(As referred in paragraph 5 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)

A government servant retiring on Superannuation, retiring, Invalid or compensation pension before completing qualifying service of 10 years, will be eligible for following service benefit :

| M.C.S. (Pension) Ruls 1982 | Length of service | Pension | Pro-rata service gratuity | Retirement Gratuity |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | Less than 10 years | not eligible for pension. | at the rate of half month's basic pay for every completed six monthly period of qualifying service. | at the rate of one fourth of month's basic pay for every completed six monthly period of qualifying service. |

**(pensioners retired after 27th Feb.2009 (A.N))**

# ANNEXURE -II

**(As referred in paragraph 5.1 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)**

**A government servant retiring on Superannuation, retiring, invalid or compensation pension after completing qualifying service of ten years or more but less than twenty years, will be eligible for following service benefits :**

| M.C.S. (Pension) Ruls 1982 | Length of service | Pension | Pro-rata service gratuity | Retirement Gratuity |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | 10 years or more but less than 20 years | 50% of last basic pay or average basic received during last 10 months whichever is more beneficial. | Not eligible for service gratuity. | at the rate of one fourth of last month's basic pay for every completed six monthly period of qualifying service. |

**(pensioners retired after 27th Feb.2009 (A.N))**

## ANNEXURE -III

**(As referred in paragraph 5.2 of Government Resolution, Finance Department, No. PEN 1099/ CR 33/SER-4 dated 30th October,2009)**

**A government servant retiring on Superannuation, retiring, invalid or compensation pension after completing qualifying service of 20 years or more will be eligible for following service benefits :**

| **M.C.S. (Pension) Ruls 1982** | **Length of service** | **Pension** | **Pro-rata service gratuity** | **Retirement Gratuity** |
|---|---|---|---|---|
| Rule 110 (1) & Rule 111 (1) | 20 years or more than 20 years | 50% of last basic pay or average basic received during last 10 months whichever is more beneficial. | Not eligible for service gratuity. | at the rate of one fourth of last month's basic pay for every completed six monthly period of qualifying service not exceeding sixty six half years. |